**मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयातील सह मुख्य निवडणूक अधिकारी संवर्गातील १ पद अवर सचिव पदामध्ये श्रेणी अवनत व रुपांतरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा १७२५/प्र.क्र.५/आस्था-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०२५

**वाचा :**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक :आढावा-१६१६/प्र.क्र.२१३/१९-अ दिनांक १७ जानेवारी,२०२३.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण ३५२४/प्र.क्र.२४/आस्था २ दिनांक १९ मार्च,२०२४

**प्रस्तावना :**

लोकसभा व विधानसभा सार्वत्रिक निवडणूक कार्यक्रम पूर्ण झाला असला तरी सध्या निवडणूकांच्या अनुषंगाने भारत निवडणूक आयोगाकडून प्राप्त होणाऱ्या निर्देशांनुसार विहित वेळेत कामकाज पार पाडणे आवश्यक असल्याने, कामकाजाचे नियोजन व संनियंत्रण करण्यासाठी अवर सचिव पदाची तात्पुरत्या स्वरुपात मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयास आवश्यकता आहे. यापूर्वी निवडणूकीच्या कामाकरीता संदर्भाधीन शासन आदेश दिनांक १९ मार्च,२०२४ अन्वये सह मुख्य निवडणूक अधिकारी हे पद अवर सचिव पदामध्ये दिनांक ३१ डिसेंबर,२०२४ पर्यंत श्रेणी अवनत व रुपांतरीत करण्यात आले होते. सदर पदाचा कालावधी संपुष्टात आल्याने तसेच निवडणूकीच्या कामकाजाकरीता अवर सचिव पदाची आवश्यकता असल्याने मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयातील सहमुख्य निवडणूक अधिकारी हे पद अवर सचिव पदात तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी अवनत व रुपांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

लोकसभा व विधानसभा सार्वत्रिक निवडणूकांचे कामकाज भारत निवडणूक आयोगाकडून वेळोवेळी प्राप्त होणाऱ्या निर्देशानुसार विहित वेळेत पार पाडणे आवश्यक असल्याने, कामकाजाचे नियोजन व संनियंत्रण करण्यासाठी मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयास मनुष्यबळाची आवश्यकता आहे. मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयातील सह मुख्य निवडणूक अधिकारी वेतनश्रेणी एस २५: रु.७८८००-

२०९२०० या संवर्गातील १ पद अवर सचिव वेतनस्तर एस-२३ : रु.६७७००-२०८७०० या पदामध्ये दिनांक ३१ मार्च,२०२५ पर्यंत तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी अवनत व रुपांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तद्नंतर सदर पद त्याच्या मूळ पदामध्ये म्हणजेच सह मुख्य निवडणूक अधिकारी या पदामध्ये आपोआप रुपांतरीत होईल

२. याबाबत होणारा खर्च सामान्य प्रशासन विभागाच्या संबंधित लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२/२०२५/सेवा-९, दिनांक १७.०१.२०२५ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०२५०३०६१५४०२१६३०७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KASHINATH SHINDE

Digitally signed by KIRAN KASHINATH SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e87a32115497d05a2e91b08062bea862d1d55f490eb311d2f0e47e2fa1faf797, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9FF022F2E9C0F3C0DF2FD6BEE75DF1F6AE3C48080BAD7972572EE58C3F741862, cn=KIRAN KASHINATH SHINDE
Date: 2025.03.06 15:41:40 +05'30'

**( कि. का. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मुख्यमंत्री यांचे अतिरिक्त मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव व सह मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. अवर सचिव (रोखशा ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन :निवडणूक / आस्था-१ सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती / कार्यासन- आस्था-२.